"National Mission for Safety of Women" अंतर्गत १३८ विशेष जलदगती न्यायालयांकरीता वित्तीय वर्ष २०२०-२१ करीता निधी वितरीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: जगन्या १४१९/प्र.क्र.४/का- ९**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,

दिनांक:- १२.०६.२०२०.

**पहा :** १. विधि व न्याय विभाग शासन निर्णय क्रमांक: जगन्या १४१९/प्र.क्र.४/का- नऊ दि.०४.०३.२०२०.

२. वित्त विभाग शासन परिपत्रक अर्थसं २०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६.०४.२०२०.

३. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक: अर्थसं २०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.०४.०५.२०२०.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या "National Mission for Safety of Women" अंतर्गत महिला व बालकांवरील अत्याचाराची प्रलंबित प्रकरणे निकाली काढण्याकरीता महाराष्ट्र राज्यात १३८ विशेष जलदगती न्यायालये संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये स्थापन करण्यास व यानुषंगाने आवश्यक पदनिर्मिती तसेच त्याकरीता येणा-या आवर्ती व अनावर्ती खर्चास मान्यता देण्यात आली आहे. वित्तीय वर्ष २०२०-२१ करीता प्रस्तुत केंद्र पुरस्कृत योजने अंतर्गत प्रत्येक न्यायालयासाठी वार्षिक रु. ७५ लक्ष याप्रमाणे राज्यातील १३८ विशेष जलदगती न्यायालयांसाठी एकूण रु. १०३.५० कोटी इतकी तरतूद केली असून, यामध्ये केंद्र हिस्सा ६०% प्रमाणे ६२.१० कोटी इतका असून, उर्वरीत राज्य हिश्यापोटी (४०%) रु.४१.४० कोटी इतका निधी राज्य शासनाने उपलब्ध करावयाचा आहे.

वित्तीय वर्ष २०१९-२० मध्ये केंद्र शासनाकडून केंद्र हिस्सा रु.६२.१० कोटीपैकी रु. ३१.०५ कोटी इतका निधी राज्य शासनास उपलब्ध करुन देण्यात आला आहे. नियोजन विभागाने वित्त विभागाच्या, शासन निर्णय दि. ०४.०५.२०२० च्या तरतुदी अधीन राहून केंद्र शासनाकडून वित्तीय वर्ष २०१९-२०२० मध्ये प्राप्त झालेला रु. ३१.०५ कोटी इतका निधी वित्तीय वर्ष २०२०-२०२१ मध्ये खर्च करण्यास सहमती दर्शवली आहे.

वित्त विभाग, शासन निर्णय दि. ०४.०५.२०२० अन्वये कोविड -१९ च्या संसर्गजन्य रोगामुळे सन २०२०-२१या वित्तीय वर्षात होणाऱ्या अर्थव्यवस्थेवरील परिणामामुळे खर्चात कपात करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. वित्त विभाग, शासन निर्णय दि. ०४.०५.२०२० च्या मुद्दा क्र. २ मधील तरतुदीनुसार सदर योजनेसाठी चालू वित्तीय वर्ष २०२०-२१ करीता तरतूद करण्यात आलेल्या रु.४१.४० कोटी इतक्या राज्य हिश्यापैकी ३३% प्रमाणे रु.१३.६६ कोटी इतका खर्च करण्यास वित्त विभागाने सहमती दर्शवली आहे. **यानुसार वित्तीय वर्ष २०२०-२१ करीता राज्य हिश्यापैकी रु. १३.६६ कोटी इतकाच निधी उपलब्ध होणार आहे.** तसेच वित्तीय वर्ष २०२०-२१ च्या पहिल्या तिमाहीकरिता वित्त विभागाने राज्य हिश्यापैकी रु.३.४१५ कोटी इतका निधी वितरीत करण्यास मान्यता दिली आहे.

दि.१६.०४.२०२० रोजीच्या परिपत्रकानुसार, वित्त विभागाने केवळ ०१-वेतन, ०६-दूरध्वनी, वीज आणि पाणी शुल्क, १३- कार्यालयीन खर्च, १४- भाडेपट्टी व कर या या उद्दिष्टाखालील निधी वितरणासाठी BEAMS प्रणालीवर सध्या उपलब्ध करुन दिला आहे. सदर योजनेकरीता सद्यस्थितीत केंद्र हिस्सा रु. ९,६४,५७,०००/- (रुपये नऊ कोटी चौसष्ट लक्ष सत्तावन्न हजार फक्त) इतका निधी वित्त विभागाने BEAMS प्रणालीवर वर उपलब्ध करून दिला आहे. तसेच राज्य हिस्सा. रु.३,४१,५०,०००/-कोटी (रुपये तीन कोटी एकेचाळीस लक्ष पन्नास हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. याप्रमाणे सदर योजनेकरीता एकूण रु.१३,०६,०७,०००/- (रुपये तेरा कोटी सहा लक्ष सात हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

केंद्र शासनाच्या "National Mission for Safety of Women" अंतर्गत १३८ विशेष जलदगती न्यायालयांकरीता केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीपैकी रु. ९,६४,५७,०००/- (रुपये नऊ कोटी चौसष्ट लक्ष सत्तावन्न हजार फक्त) इतका निधी व राज्य हिश्यापैकी रु.३,४१,५०,०००/-कोटी (रुपये तीन कोटी एकेचाळीस लक्ष पन्नास हजार फक्त) इतका निधी याप्रमाणे एकूण रु.१३,०६,०७,०००/- (रुपये तेरा कोटी सहा लक्ष सात हजार फक्त) इतका निधी वित्तीय वर्ष २०२०-२१ साठीच्या पहिल्या तिमाहीकरिता नियंत्रक अधिकारी म्हणून , मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई (J ०००२) यांना वितरित करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. वितरीत करावयाच्या निधीची लेखाशीर्ष व उद्दिष्टनिहाय तरतूद पुढीलप्रमाणे आहे -

**" मागणी क्र. जे-१, (१४) (०१) महिलांच्या सुरक्षिततेसाठी राष्ट्रीय उपक्रम अंतर्गत महिला व बालक अंतर्भूत असलेली प्रकरणे त्वरित निकाली काढण्यासाठी विशेष न्यायालयांची स्थापना (केंद्र हिस्सा ६०%)(कार्यक्रम) (२०१४ ०६६४)"**

**केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष - २०१४ ०६६४)**

| उद्दिष्टे | तरतूद (रु.हजारात) |
|---|---|
| ०१- वेतन | ६६२६७.००० |
| ०६- दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क | १८.००० |
| १३- कार्यालयीन खर्च | ९९४८.००० |
| १४- भाडेपट्टी व कर | २०२२४.००० |
| **एकूण** | **९६४५७.०००** |

**" मागणी क्र. जे-१, (१४) (०२) महिलांच्या सुरक्षिततेसाठी राष्ट्रीय उपक्रम अंतर्गत महिला व बालक अंतर्भूत असलेली प्रकरणे त्वरित निकाली काढण्यासाठी विशेष न्यायालयांची स्थापना (राज्य हिस्सा ४०%)(कार्यक्रम) (२०१४ ०६७३)"**

राज्य हिस्सा (लेखाशिर्ष - २०१४ ०६७३)

| उद्दिष्टे | तरतूद (रु.हजारात) |
|---|---|
| ०१-वेतन | २२०८९.००० |
| ०६- दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क | १२.००० |
| १३- कार्यालयीन खर्च | ३३१६.००० |
| १४- भाडेपट्टी व कर | ८७३३.००० |
| **एकूण** | **३४१५०.०००** |

३. सदर योजनेकरीता वित्त विभागाकडून उर्वरित निधी उपलब्ध झाल्यानंतर नियंत्रक अधिकारी, मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई (J ०००२) यांना वितरित करण्यात येईल.

४. याबाबतच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र विहीत नमुन्यात महालेखापाल कार्यालय व शासनास सादर करण्यात यावे.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. अ.सं.क्र. १६/१४४३ १२/६/२०२०व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ अनौ.सं.क्र.१६५/अर्थोपाय२६/०५/२०२० व अनौ.सं.क्र. २६०/२०२०/व्यय-५ ०१/०६/२०२० अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६१२१५३७३९९८१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uday Balkrishna Shukla

Digitally signed by Uday Balkrishna Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=25569b2f94f1c4543dd14cfd7554a74f343a754d96291ae76706a168af42cab3,
serialNumber=7b8594c3caa0542cc27f913c48e1f9c0084209e339cce7fd9de455fe24a26bbb, cn=Uday Balkrishna Shukla
Date: 2020.06.12 15:48:50 +05'30'

(उदय बा. शुक्ल)
विधि सल्लागार-नि-सह सचिव

**प्रति,**

१) मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) एक/दोन, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
३) मा. मुख्य सचिवांचे उप सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
४) प्रबंधक (निरीक्षणे १ व २), उच्च न्यायालय, मुंबई.
५) प्रबंधक (अर्थसंकल्प व वित्त), उच्च न्यायालय, मुंबई.
६) वित्त विभाग (कार्या. व्यय-५/अर्थसंकल्प-११).
७) नियोजन विभाग ( कार्या-१४४३)
८) कार्यासन अधिकारी, कार्यासन २३/२४/२५, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती.